**ग्रामीण रुग्णालय, मालेगाव, जि.नांदेड येथील "वैद्यकीय अधिक्षक, वर्ग १ (गट-अ)" यांना रुग्णालयातील मंजूर पदांचे वेतन व इतर भत्ते अदा करण्यासाठी तसेच आकस्मिक खर्चाची देयके कोषागारातून पारित करण्यासाठी "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आसंअ-२०२३/ प्र.क्र.२०४/ आरोग्य-४**
मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मंत्रालय, मुंबई.
तारीख: २५ ऑगस्ट, २०२३.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.पदनि-२०२१/प्र.क्र.१५४/आरोग्य-३अ, दिनांक २३.०६.२०२२.
२) सहसंचालक, आरोग्य सेवा, राज्यस्तर (रुग्णालये), मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-२/ /न.क्र.९१८४८/काप्र व आसंअ सुशा/५५६१-६६/२३, दिनांक २५.०५.२०२३.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण रुग्णालय, मालेगाव, जि. नांदेड (३० खाटा) या रुग्णालयाकरीता उपरोक्त क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये अधिकारी व कर्मचाऱ्यांची पदे निर्माण करण्यात आली आहेत. या अनुषंगाने ग्रामीण रुग्णालय, मालेगाव, जि. नांदेड (३० खाटा) येथील रुग्णालयाचे कार्यालयीन कामकाज व रुग्णालयातील मंजूर पदांचे वेतन व इतर भत्ते अदा करण्यासाठी तसेच आकस्मिक खर्चाची देयके कोषागारातून पारित करण्यासाठी "वैद्यकीय अधिक्षक, वर्ग १ (गट-अ)" यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

ग्रामीण रुग्णालय, मालेगाव, जि. नांदेड (३० खाटा) येथील रुग्णालयाचे कार्यालयीन कामकाज व रुग्णालयातील मंजूर पदांचे वेतन व इतर भत्ते अदा करण्यासाठी तसेच आकस्मिक खर्चाची देयके कोषागारातून पारित करण्यासाठी, वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५ च्या सोबतच्या परिशिष्टामधील, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग- पहिला, अनुक्रमांक्र ३ येथील नियम २ अन्वये प्रदान केलेल्या प्राधिकारास अनुसरुन "वैद्यकीय अधिक्षक, वर्ग १ (गट-अ)" यांना "कार्यालय प्रमुख" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच,

महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम क्र.१५६ मधील तरतूदीनुसार "वैद्यकीय अधिक्षक, वर्ग १ (गट-अ)"यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या (कोषा प्रशा-५), दिनांक ०९.०८.२०२३ च्या दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०३११५३२९९९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.08.25 14:35:58 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संचालक आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
२. संचालक आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
४. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा),आरोग्य सेवा, पुणे.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा (लातूर मंडळ), लातूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
८. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय मालेगाव, जिल्हा नांदेड.
९. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णाय, नांदेड.
१०.महालेखापाल १/२,महाराष्ट्र (लेखा व लेखापरिक्षा) /लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/ नागपूर.
११.वित्त विभाग (विनियम कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
१२.कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१३.निवडनस्ती ( आरोग्य-४ ).